महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसेस मधून महिला बंद्यांना त्यांना जेथे अटक करण्यांत आली त्या ठिकाणी पोहोचविण्या-साठी सन १९९८-९९ या वर्षात अदा करावयाची रक्कम.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक-एमआयएस-०१९८/४[२०]/पोआरएस-२.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक:-२६ ऑक्टोबर १९९८.

वाचा:- [१] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्रमांक-एसटीभाडे/ दू.का.अकोले/१९९७/का-३, दिनांक १९.११.९७.

शासन निर्णय:- विडी कामगारांच्या राज्यव्यापी जेलभरो आंदोलनातील सत्याग्रहीं-पैकी ३८५ स्त्री सत्याग्रही बंद्यांना अकोले जि. अहमदनगर येथे दिनांक २३.७.९७ रोजी अटक करण्यांत येऊन त्यांना येरवडा मध्यवर्ती कारागृहांत ठेवण्यांत आले. त्यानंतर त्यांना दिनांक ३०.७.९७ रोजी जेथे अटक करण्यांत आली होती तेथे नेऊन सोडण्यासाठी कारागृहाने ७ एस.टी. बसेस गाड्या प्रासंगिक कराराने घेतल्यामुळे एस.टी. महामंडळाकडून प्राप्त झालेल्या रु.३१,२६८/- एवढ्या भाड्याच्या देयकाची रक्कम अदा करण्यास मान्यता देण्याबाबत प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

उपरोक्त प्रस्तावाच्या अनुषंगाने शासनाने असा निर्णय घेतला आहे की, विडी कामगारांच्या राज्यव्यापी जेलभरो आंदोलनातील, सत्याग्रहींपैकी ३८५ स्त्री सत्याग्रही बंद्यांना अकोले, जि. अहमदनगर येथे अटक केल्यानंतर येरवडा मध्यवर्ती कारागृहांत ठेवल्यानंतर दिनांक ३०.७.९७ रोजी त्यांना जेथे अटक करण्यांत आली तेथे नेऊन सोडण्यासाठी कारागृहाने एस.टी. महामंडळाकडून ७ एसटी. गाड्या प्रासंगिक कराराने घेतल्यामुळे एस.टी. महामंडळास भाड्यापोटी रु.३१,२६८/- [रुपये एकतीस हजार दोनशे अडुसष्ट फक्त] एवढी रक्कम अदा करण्यास शासन या आदेशाद्वारे मान्यता देत आहे. ही रक्कम तात्काळ महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्यांत यावी.

यासाठी होणारा खर्च "२०५६-तुरुंग-००१-संचालनालय व प्रशासन-००१ [एक] कारागृह निरीक्षणालय-२०१ इतर खर्च-दत्तमत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व तो सन १९९८-९९ या चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-५४७/९८/व्यय-८, दि. ४.९.९८ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

[ ता.स. नाईक ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य [लेखा व अनुज्ञेयता] मुंबई/नागपूर.

महालेखापाल-१/२, [लेखा परिक्षा] महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

उपमहाव्यवस्थापक [वाहतूक] महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.

कोषागार अधिकारी, पुणे.

वित्त विभाग [व्यय-८]

गृह विभाग, बीयुडी-१.

गृह विभाग, परिवहन-१.